नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्याबाबत

**"राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषीपतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य" (२४२५ २५१५).**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. बीयुडी ०७१६/प्रक्र २२७/२-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ नोव्हेंबर, २०१६

वाचा:- १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सीसीआर/ १४०६/प्र.क्र.२४७/ २-स दिनांक १७/५/२००६

२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सीसीआर/०३१३/प्र.क्र.१४४/ २-स दिनांक ६/९/२०१४

प्रस्तावना :-

२. शासन निर्णय उपरोक्त वाचा क्र २ नुसार, राज्यातील प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे नुकसान भरुन काढण्यासाठी त्यांना या संस्थांनी प्रत्येक आर्थिक वर्षात केलेल्या पीक कर्ज वाटपाच्या प्रमाणात दिनांक १७.५.२००६ च्या शासन निर्णयानुसार देण्यात येणा-या व्याज परतावा योजनेअंतर्गत खालीलप्रमाणे अर्थसहाय्य काही अटींच्या अधिन राहून मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | रु.२५ लाखापर्यंत पीक कर्ज वाटप केलेल्या संस्थांना | १.५% |
| २ | रु.२५ लाख ते ५० लाखापर्यंत पीक कर्ज वाटप केलेल्या संस्थांना | १% |
| ३ | रु.५० लाख ते १ कोटीपर्यंत पीक कर्ज वाटप केलेल्या संस्थांना | ०.७५% |
| ४ | रु.१ कोटीपेक्षा जास्त पीक कर्ज वाटप केलेल्या संस्थांना | ०.५% |

वरील प्रमाणे प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांना द्यावयाच्या अर्थसहाय्याची कमाल मर्यादा रु. १ लाख प्रती संस्था एवढी आहे. हे सुधारीत धोरण शेतक-यांना ६% दराने (परिणामकारक दर शून्य टक्के) पीक कर्ज वाटप करण्याचे शासनाचे धोरण अंमलात असेपर्यंत चालू राहणार आहे.

या अनुषंगाने सुरु करावयाच्या **"राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषीपतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य "** या योजनेतर योजनेसाठी (Non Plan) साठी नवीन लेखाशिर्ष निर्माण करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

**"राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषीपतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य"** या योजनेतर योजनेकरीता उपरोक्त वाचा क्र २ शासन निर्णयान्वये प्राथमीक कृषीपतपुरवठा सहकारी संस्थांना त्यांनी केलेल्या पीक कर्ज वाटपाच्या

प्रमाणात ०.५% ते १.५ % या प्रमाणे अर्थसहाय्य करणेत येते. या योजनेसाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशिर्ष सुरु करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक व्ही-०२<br>२४२५-- सहकार<br>(००)(१९५) सहकारी संस्थांना सहाय्य<br>(०१) सहकारी संस्थांना सहाय्य<br>(०१)( ०२) **राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषीपतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य**<br>३३- अर्थसहाय्य (दत्तमत)(योजनेतर)<br>(२४२५ २५१५) | Demand No. V-02<br>2425- Co-operation<br>(00)(195) Assistance to Co-operatives<br>(01) Assistance to Co-operatives<br>(01)( 02) **Assistance for Strengthening of Primary Agricultural Credit co-operative Societies under Short Term co-operative credit structure.**<br>33, Subsidies (Voted)(Non-plan)<br>(2425 2515) |

२. या योजने अंतर्गत सन २०१७-१८ करीता अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध करण्याबाबतचा एकत्रीत प्रस्ताव वित्तीय प्रपत्रात सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयाने शासनास संबंधित योजना अंमलबजावणीच्या कार्यासनास सादर करावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८९/अर्थसंकल्प-१३/१६, दिनांक ५.८.२०१६ व ५०१/अर्थ १३, दि. २८.१०.२०१६ अन्वये व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि/चा-१/स.प.व व.वि./ युओआर ७३/२०१६-१७/१३२२, दिनांक १८/९/२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२११६०४४९४००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2016.11.21 16:07:21 +05'30'

( दि.म. राणे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे

५) निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, पुणे.

६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)

८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)

९) सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका / महाराष्ट्र राज्य सहकारी बँक.

१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय -२), मंत्रालय, मुंबई

११) अवर सचिव (कार्यासन १७-स) सहकार **,** पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) लेखा व कोषागारे संचालनालय, (संगणक शाखा) मुंबई

१३) निवड नस्ती (कार्यासन २-स).